महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
येथे व्याख्यानासाठी येणाऱ्या अतिथी
व्याख्यात्यांसाठी मानधनात वाढ करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मानधन-२०१२/(७८/२०१२)/लाक्षेवि(आस्था)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ६ सप्टेंबर, २०१४

**वाचा —**

१) शासन निर्णय क्रमांकः **पाटबंधारे विभाग, क्रमांक-मानधन-१००/(५८/२०००)/पासं, दिनांक ३०.४.२००२.**

२) शासन निर्णय क्रमांकः **जलसंपदा विभाग, क्रमांक-मा-धन-२०१०/११८/१०/ला(आस्था), दिनांक २३.१२.२०१०.**

३) **महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांचे पत्र क्रमांक-मअप्रप/ प्रशिक्षण/२९६/२०१२, दिनांक ४.६.२०१२.**

**प्रस्तावना —**

महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक येथे व्याख्यानासाठी येणाऱ्या अतिथी व्याख्यात्यांना मानधनात वाढ संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली होती. सदर शासन निर्णयामध्ये पहिल्या व्याख्यानाकरिता वेगळा दर आणि त्याच दिवशी होणाऱ्या नंतरच्या व्याख्यानाकरिता ५०% कमी दर अशी पध्दत असल्याने ती पध्दत बदलून प्रत्येक व्याख्यानास समान दराने अदायगी करण्याची विनंती प्रबोधिनीने संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये केली होती. प्रबोधिनीची विनंती विचारात घेऊन प्रबोधिनीमध्ये व्याख्यानासाठी येणाऱ्या अतिथी व्याख्यातांना पहिल्या व्याख्यानाकरिता व त्याचदिवशी होणाऱ्या नंतरच्या व्याख्यानाकरिता द्यावयाच्या मानधन दरांमध्ये सुधारणा व व्याख्यात्यांच्या मानधनात वाढ करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय—**

महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक येथे विविध प्रशिक्षण कार्यक्रमासाठी पाहुणे व्याख्यात्यांना (Guest Faculty) बोलविले जाते. अशा व्याख्यात्यांच्या मानधनाबाबत संदर्भ क्रमांक-२ येथील शासन निर्णयात सुधारणा करुन खालीलप्रमाणे सुधारीत दर शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू करण्यात येत आहे.

| अ.क्र. | व्याख्यानाचा तपशिल कालावधी | सध्याचे मानधन | सुधारित मानधन रु. | शेरा |
|---|---|---|---|---|
| अ) महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी नाशिक या संस्थेमध्ये अंतर्गत विभागात व्याख्यानासाठी | | | | |
| १)<br>२)<br>३) | ०१ तासासाठी<br>०१.३० तासासाठी<br>त्याच दिवशी पहिल्या व्याख्यानानंतर पुढील प्रत्येक ९० मिनिटांचे व्याख्याने | १) -----<br>२) रु. ५००/-<br>३) रु. २५०/-<br>४) रु. १०००/-<br>(एका दिवशी दोन पेक्षा अधिक व्याख्याने दिल्यास दयावयाचे एकित्रत कमाल मानधन) | १) रु. ७५०/-<br>२) रु. १०००/-<br>३) ---- | • वैयक्तिक रित्या सत्र व्याख्यानासाठी (सामुहीक रित्या नाही)<br>• आकर्षक व प्रभावी व्याख्यात्यांना आकर्षीत करणेसाठी<br>• व्याख्याता त्यांचे नोट किंवा सादरीकरण Hard Copy किंवा Soft Copy स्वरुपात देईल |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४) | ०२.०० तासासाठी | ----- | रु. १५००/- | |
| ५) | ०२.०० तासासाठी | ----- | रु. १०००/- | पॅनलवरील चर्चेसाठी प्रत्येकी रु. १०००/- (प्रति व्यक्ती) |
| ब) महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी नाशिक बाहेरील प्रशिक्षणासाठी | | | | |
| १) | ०१.३० तासासाठी | ----- | रु. ७५०/- | |
| २) | ----- | ----- | रु. १०००/- | विशिष्टतज्ञ अतिथी व्याख्याता महासंचालक (मेरी), नाशिक यांच्या पूर्व परवानगीने. |
| क) मा. विशेष तज्ञ अतिथी व्याख्याता | | | | |
| | | | | १. विशेष अतिथी व्याख्यात्यास मुख्य अभियंता (मेटा), नाशिक यांच्या पूर्व परवानगीने रु.३०००/- मानधन देय राहील.<br>२. रु.३०००/- पेक्षा जास्त मानधन दयावयाचे असल्यास महासंचालक (मेरी), नाशिक यांची पूर्व सहमती. |

- महत्वाची सूचना : एका दिवशी दोन पेक्षा अधिक व्याख्याने देता येणार नाही. (पॅनलवरील चर्चेसह)

उक्त खर्च मुख्य लेखाशीर्ष " २७०१ - मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प, ८०-सर्वसाधारण, ००३-प्रशिक्षण, (०१) आस्थापना, (०१) (०१) मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक (योजनेतर) (२७०१ २४८१) " याखाली खर्ची घालण्यात यावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

वरील शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२२/२०१४/व्यय-१२, दिनांक १५.३.२०१४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

उपरोक्त शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०६११४६२१५८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Babubhai Galiyal

Digitally signed by Ramesh Babubhai Galiyal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ramesh Babubhai Galiyal
Date: 2014.09.11 12:27:02 +05'30'

(र. बा. गलियाल)
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. मा.मंत्री, जलसंपदा (कृ.खो.पा.म.वगळून) यांचे स्वीय सहायक,
२. मा.मंत्री, जलसंपदा, (कृ.खो.पा.मं) यांचे स्वीय सहायक,

३. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक,
४. प्रधान सचिव (जसंव्य. व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक,
५. प्रधान सचिव (जसंनि. व वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक,
६. प्रधान सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई-४०००३२,
७. महालेखापाल (१) (२) (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
८. महालेखापाल (१) (२) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
९. महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी), नाशिक,
१०. मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक,
११. जिल्हा कोषागार कार्यालय, नाशिक/पुणे/नागपूर व औरंगाबाद,
१२. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१३. सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१४. आं.वि.स.व स.स., जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१५. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (सेवा-५ व ६ / व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-३२,
१६. निवड नस्ती/लाक्षेवि (आस्था)